पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य व पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अधिनस्त कार्यालयातील कंत्राटी पध्दतीने नियुक्त विधि सल्लागार, विधि अधिकारी व विधि निदेशक यांच्या मानधनात वाढ करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- डीपीपी-२०१४/प्र.क्र.०७/पोल-१०**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक: २१ ऑगस्ट, २०१८

वाचा:- १) गृह विभाग, शासन निर्णय, क्र. एपीओ-३१०६/प्र.क्र.२२७/पोल-१०, दिनांक २१.०८.२००६
२) गृह विभाग, शासन निर्णय, क्र. एसपीपी-२००५/प्र.क्र.२४७/पोल-१०, दिनांक १५.०९.२००६

**प्रस्तावना :-**

पोलीसांकडून दाखल होणारे खटले विधीवत दाखल व्हावेत, त्यांना वैधानिक सहाय्य मिळावे व गुन्हेगारांना शासन होऊन कायदा व सुव्यवस्था अधिक सक्षम व्हावी तसेच, पोलीस प्रशिक्षण संस्थांमध्ये पोलीसांना कायदेविषयक प्रशिक्षण देणे सुलभ व्हावे म्हणून महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई व पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवर संदर्भाधीन शासन निर्णयान्वये, एकत्रित वेतनावर कंत्राटी पध्दतीने विधिविषयक अधिकाऱ्यांची ४७१ पदे निर्माण करण्यात आलेली आहे. सदर पदांचे एकत्रित अनुज्ञेय मासिक वेतन, दुरध्वनी व प्रवासखर्चाची रक्कम संदर्भाधीन दिनांक १५.०९.२००६ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेली होती. सध्याचे प्रचलित मानधन हे कमी असल्यामुळे कार्यक्षम / निष्णात विधि अधिकारी सदर पदावर येण्यास इच्छूक नसतात. त्यामुळे या पदांसाठी निश्चित करण्यात आलेले मानधन वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई व पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवर कंत्राटी पध्दतीने नियुक्ती करण्यात आलेल्या विधि सल्लागार, विधि अधिकारी, गट -अ / विधि अधिकारी, गट - ब / विधि निर्देशक या पदांसाठी निश्चित करण्यात आलेले मानधन पुढीलप्रमाणे वाढविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | पदनाम | मंजूर पदे | विद्यमान मानधन + दुरध्वनी व प्रवासखर्च | सुधारीत मानधन + दुरध्वनी व प्रवासखर्च |
|---|---|---|---|---|
| १. | विधि सल्लागार | ४ | रु.२५,०००/-+रु.३,०००/- | रु.३५,०००/-+रु.५,०००/- |
| २. | विधि अधिकारी, गट-अ | ३० | रु.२०,०००/-+ रु.५,०००/- | रु.३०,०००/-+ रु.५,०००/- |
| ३. | विधि अधिकारी, गट-ब | ५५ | रु.१५,०००/-+ रु.५,०००/- | रु.२५,०००/-+ रु.३,०००/- |
| ४. | विधि अधिकारी | २८३ | रु.१२,०००/-+ रु.३,०००/- | रु.२०,०००/-+ रु.३,०००/- |
| ५. | विधि निर्देशक | ९९ | रु.१२,०००/-+ रु.३,०००/- | रु.२०,०००/-+ रु.३,०००/- |
| | एकूण पदे | ४७१ | | |

२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई व पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या कार्यालयातील अधिनस्त कंत्राटी अधिकाऱ्यांना अदा करावयाच्या मानधन, दूरध्वनी व प्रवासखर्चापोटी ठोक रक्कमेचा खर्च, त्या-त्या कार्यालयासाठी उक्त प्रयोजनासाठी संबंधित लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या व उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा. मानधनात करण्यात आलेली ही वाढ शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येईल.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१४५/१८/व्यय-७, दिनांक ०३.०८.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार व मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक क्र. २०१८०८२११७४७४०४९२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ce6f6edd7e1dfc6b4d6b65b7d93aa1a1dbcf0ec79c7c2143850ff6e8fdcb4c0d, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2018.08.21 17:51:35 +05'30'

**( किशोर शामराव भालेराव )**
उप सचिव (विधि), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (गृह) (शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.राज्यमंत्री (गृह) (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
६) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
८) अपर मुख्य सचिव (गृह), यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
९) अपर मुख्य सचिव (अ व सु.) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
११) सर्व पोलीस आयुक्त,
१२) सर्व पोलीस अधीक्षक,
१३) सर्व पोलीस घटक प्रमुख,
१४) सर्व सह सचिव/ उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१६) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१७) वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
१८) निवड नस्ती.